सासवड ग्रामीण रुग्णालय जिल्हा पुणे चे ३० खाटांवरुन ५० खाटांचे उपजिल्हा रुग्णालयात श्रेणीवर्धन करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१८प्र.क्र.२५२/आ-३ अ

१० वा मजला, संकुल इमारत
गो.ते.रुग्णालय आवार, मुंबई-४००००१
दिनांक १७ नोव्हेंबर,२०१८

वाचा:-

**सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचे पत्र क. संआसे/ राज्यस्तर/ टे-३अ/कक्ष-३/ग्रा.रु.सासवड,जि.पुणे १०० खाटांश्रेणी/पु.सं./५०१८-१९/दि.१६.५.२०१८.**

प्रस्तावना

ग्रामीण रुग्णालय सासवड जि.पुणे या रुग्णालयाचे श्रेणीवर्धन करण्याबाबतचा सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर) मुंबई यांचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय

ग्रामीण रुग्णालय सासवड जि.पुणे या ३० खाटांच्या ग्रामीण रुग्णालयाचे ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयात श्रेणीवर्धन करण्यास "विशेषबाब" म्हणून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयाच्या इमारतीसाठी अंदापत्रक व नकाशे तयार करण्याची कार्यवाही हाती घेण्यात यावी, अतिरिक्त पद निर्मिती व निधी उपलब्ध करुन देण्याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०२१८३६५२०८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra Shamraoji Kaurte
Date: 2018.11.17 14:55:24 +05'30'

**( रा.शा.कौरते )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर) मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, पुणे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. वैद्यकीय अधिक्षक, उपजिल्हा रुग्णालय, सासवड जि. पुणे.
९. नियोजन विभाग, (का.१४७२) मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई
१२. निवडनस्ती (आरोग्य ३-अ)